**पशुसंवर्धन विभागांतर्गत संस्थाना आवश्यक औषधी, हत्यारे, अवजारे, उपकरणे, रंगद्रव्ये, रसायने, यंत्रसामुग्री, लस, पशुखाद्य, वैरणीची बियाणे, इत्यादी खरेदीसाठी राज्ययस्तरीय प्रशासकीय खरेदी समिती, तांत्रिक विर्निदेश) Technical Specifications) ठरविण्यासाठी तांत्रिक विर्निदेश समिती व उपसमिती गठीत तसेच खरेदीच्या अनुषंगाने कार्यप्रणाली विहित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : डीआयएस - २०२१/ प्र.क्र. १५१/ पदुम-४,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, विस्तार, मुंबई -४०० ०३२.**
**दिनांक: - ०५ एप्रिल, २०२२.**

**वाचा:** - १. उद्योग, उर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२ /भाग-III / उद्योग-४, दि.३०.१०.२०१५

२. उद्योग, उर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२ / भाग-III / उद्योग-४, दि.१.१२.२०१६.

३. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/ प्र.क्र.१९/ पदुम-४,दि. १३.०५.२०१६.

४. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र.डीआयएस-२००९ / प्र.क्र. ४३५/ पदुम-४, दि. ५.०३.२०१०.

५. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. डीडीडी/१३०/ ६९५३/ २०२१, पसं-१२, पुणे दि. ०२.१२.२०२१.

६. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.३१ (भाग-१)/ पदुम-४,दि. ०१.११.२०२१.

**प्रस्तावना :-**

राज्यातील पशुवैद्यकीय संस्थांना दैनंदिन वापरासाठी लागणारी औषधी, हत्यारे, अवजारे, उपकरणे, रंगद्रव्ये, रसायने, यंत्रसामुग्री, लस, पशुखाद्य, वैरणीची बियाणे, इत्यादी खरेदी करण्यासाठी उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या वाचा क्र.१ येथील दि.३०.१०.२०१५ च्या शासन निर्णयासोबतच्या नियमपुस्तिकेमधील तरतुदीनुसार या विभागाचा शासन निर्णय दि. १३.०५.२०१६ अन्वये राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समिती गठीत करण्यात आली होती. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने वाचा क्र. १ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन वाचा क्र. २ येथील शासन निर्णयान्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीची सुधारीत कार्यपध्दती निश्चित करुन त्यानुषंगाने नियमपुस्तीका प्रसिध्द केलेली आहे.

२. वाचा क्र. २ येथील शासन निर्णयानुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (खुद्द) स्तरावर / विभाग स्तरावर / जिल्हा स्तरावर संबंधित खरेदीदार विभागांनी / कार्यालयांनी तात्काळ खरेदी समिती स्थापन करावयाची असून सदरच्या समित्या यापूर्वीचे खरेदी धोरण दि. ३०.१०.२०१५ अन्वये स्थापन केले असल्यास पुन्हा नव्याने स्थापन करण्याची आवश्यकता नाही अशी तरतूद केलेली असल्याने या विभागाचा शासन निर्णय दि. १३.०५.२०१६ अन्वये गठीत करण्यात आलेल्या समित्यांमार्फत खरेदी प्रक्रिया राबविण्यात येत होती.

३. खरेदी प्रक्रियेत सुसूत्रता आणण्याच्या दृष्टिने उद्योग, उर्जा व कामगार विभागाने वाचा क्र.१ येथील दि. ३०.१०.२०१५ च्या शासन निर्णयाप्रमाणे या विभागाचे शासन निर्णय दि.१३.०५.२०१६ अधिक्रमित करून त्या विभागाच्या दि.०१.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या बाबी विचारात घेवून पशुसंवर्धन विभागाच्या स्तरावर राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समिती, तांत्रिक विर्निदेश समिती व उपसमिती गठीत करण्याची बाब आणि त्याव्दारे खरेदी प्रक्रिया राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

४. वरील सर्व बाबी विचारात घेवून वाचा क्र. ३ व ४ येथील अनुक्रमे दि. १३.०५.२०१६ व दि. ०५.०३.२०१० रोजीचे व खरेदी बाबत विभागाने यापूर्वी निर्गमित केलेले इतर सर्व शासन निर्णय व परिपत्रके अधिक्रमित करुन पुढीलप्रमाणे सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

(१) पशुसंवर्धन विभागांतर्गत कार्यरत विविध संस्थांना आवश्यक असणारी औषधी, रसायने, लसी, रंगद्रव्ये, पशु-पक्षी खाद्य, बियाणे तसेच, साधन सामुग्री हत्यारे, अवजारे, उपकरणे, यंत्रसामुग्री, इत्यादींची खरेदी करण्यासाठी पुढीलप्रमाणे राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समिती गठीत करण्यात येत आहे.

**राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीची संरचना**

| | | |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २ | आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे. | सदस्य |
| ३ | सहसचिव /उप सचिव (पशुसंवर्धन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ४ | सहाय्यक संचालक (लेखा), पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. | सदस्य |
| ५ | उद्योग सहसंचालक (भां.ख.) उद्योग संचालनालय किंवा त्या विभागाचे प्रतिनिधी. | निमंत्रित |
| ६ | संबंधित क्षेत्रातील तांत्रिक तज्ञ (आवश्यकता भासल्यास). | निमंत्रित |
| ७ | अवर सचिव (पदुम-३/पदुम-४) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

(२) या विभागाच्या अर्थसंकल्पामध्ये ज्या राज्यस्तरीय व केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी किंवा इतर स्त्रोतांद्वारे निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे त्या अंतर्गतची संपूर्ण खरेदी उपरोक्त समितीमार्फत करण्यात यावी.

(३) आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी ई-निविदा प्रक्रियेसाठी ड्राफ्ट टेंडर तयार करुन ते शासनास पाठवावे आणि त्याचा वर्तमान पत्र / (ई-टेंडर) इत्यादीद्वारे प्रसिध्द करण्यासाठी शासनाच्या स्थायी नियमाप्रमाणे शासनाचे आदेशानुसार पुढील कार्यवाही करावी. टेंडर शासन स्तरावर किंवा आयुक्त पशुसंवर्धन स्तरावर प्रसिध्द करावयाचे याबाबत शासन स्तरावरून निश्चित करण्यात येईल.

(४) ई-निविदा प्रक्रिये अंतर्गत टेंडर डॉक्युमेंट तयार करणे, त्यास राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीची मान्यता प्रदान करुन घेणे यासाठी आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे उपसमितीचे गठन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे. | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे. | सदस्य |
| ३ | सहाय्यक संचालक लेखा, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे. | सदस्य |
| ४ | पशुसंवर्धन उपायुक्त ( रोग नियंत्रण), पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे. | सदस्य सचिव |

(५) ई-निविदा प्रक्रियेअंतर्गत तांत्रिक लिफाफा (Technical Bid) आणि व्यापारी लिफाफा (Commercial Bid) उपरोक्त प्रमाणे गठीत राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समिती समोर उघडण्यात यावेत.

(६) पशुसंवर्धन विभागाच्या नियंत्रणाखाली राज्यातील सर्व पशुवैद्यकीय दवाखाने, रोग अन्वेषण विभाग, पुणे, पशुजैव पदार्थ निर्मिती संस्था, पुणे, राज्यस्तरीय प्रशिक्षण केंद्र, पुणे, खाद्य विश्लेषण प्रयोगशाळा, पुणे, गुण नियंत्रण प्रयोगशाळा, गोरेगाव, मुंबई व इतर संस्थांना आवश्यक असलेल्या सर्व बाबींच्या खरेदी प्रक्रिये संदर्भात उपरोक्त राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीने कार्यवाही करावी. यासाठी आयुक्त पशुसंवर्धन कार्यालयात एक विविक्षित खरेदी कक्ष (Dedicated Purchase Cell) स्थापन करण्यात यावा.

(७) सदर खरेदी प्रक्रिया राबविताना संपूर्ण आर्थिक वर्षातील विविध योजनांमधील उपलब्ध तरतूदी विचारात घेवून वर्षभराचा एकत्रित खरेदी आराखडा आयुक्त पशुसंवर्धन, पुणे कार्यालयाने दरवर्षी एप्रिल महिन्यापर्यंत तयार करुन त्यास शासनाची मान्यता प्राप्त करुन त्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात यावी. सदरची कार्यवाही शक्यतो आर्थिक वर्षाच्या पहिल्या महिन्यात पूर्ण करण्यात यावी. तसेच, शक्यतो मे महिन्यात टेंडर प्रसिध्द केले जातील याबाबत योग्य उपाययोजना करावी.

५. तसेच, उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या वाचा क्र. २ येथील दि. ०१.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीच्या सुधारित नियमपुस्तिकेमधील परिच्छेद क्र. २.९.२ येथे नमुद केल्यानुसार पशुसंवर्धन विभागास खरेदी करावयाची विविध हत्यारे, अवजारे, उपकरणे, यंत्रसामुग्री बाबत निपक्षपातीपणे तांत्रिक विर्निदेश (Technical Specifications) ठरविण्यासाठी आणि राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीस तांत्रिक सहकार्य करण्यासाठी पशुसंवर्धन विभागांतर्गत खालीलप्रमाणे तांत्रिक विर्निदेश समिती गठीत करण्यात येत आहे.

**(अ)तांत्रिक विर्निदेश समितीची संरचना**

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे. | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. | सदस्य |
| ३ | प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, पुणे विभाग, पुणे / सहआयुक्त पशुसंवर्धन, पशुजैव पदार्थ निर्मिती संस्था, पुणे / सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, पुणे. (ज्या संस्थेसाठी खरेदी असेल त्या संस्थेचे प्रमुख). | सदस्य |
| ४ | विभाग प्रमुख (औषधीशास्त्र) / विभाग प्रमुख (शल्यचिकित्सा) / पशु व्यवस्थापन विभाग, क्रांतिसिंह नानापाटील पशुवैदयकीय महाविद्यालय, शिरवळ, जि. सातारा. | निमंत्रित |
| ५ | पशुसंवर्धन उपआयुक्त (रोग नियंत्रण कक्ष / पशुधन कक्ष) / उपसंचालक (वैरण विकास), पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालय (ज्या कक्षाशी संबंधित खरेदी असेल त्या कक्षाचे प्रमुख). | सदस्य सचिव |

**(ब)तांत्रिक विर्निदेश समितीची कार्ये:**

(१) पशुसंवर्धन विभागांतर्गत विविध संस्थांना दैनंदिन पशुरुग्ण सेवेच्या कामकाजासाठी खरेदी प्रस्तावित केलेल्या हत्यारे, अवजारे, उपकरणे व यंत्रसामुग्री इत्यादी यांची उपयुक्तता तपासून त्यांचे तांत्रिक विर्निदेश (Technical Specifications) निश्चित करणे.

(२) हत्यारे, अवजारे, उपकरणे, यंत्रसामुग्रीची विक्रीपश्चात सेवा, सुट्या भागांची उपलब्धता, हमी कालावधी (वॉरन्टी पिरियड), इ. सर्व बाबींचा विचार करून उपयुक्त हत्यारे, अवजारे, उपकरणे, यंत्रसामुग्रीचे तांत्रिक विर्निदेश (Technical Specifications) निश्चित करणे.

(३) हत्यारे, अवजारे, उपकरणे, यंत्रसामुग्रीचे घटक भाग यांच्या गुणवत्तेची माहिती घेवून अशी हत्यारे, अवजारे, उपकरणे, यंत्रसामुग्री इत्यादी खरेदीसाठी निवड करणे.

६. **सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना -:**

(१) वरील खरेदी समितीने संबंधित आर्थिक वर्षात विविध योजनेंतर्गत उपलब्ध असलेला जिल्हा / राज्य / केंद्र पुरस्कृत योजनांचा अर्थसंकल्पित निधी विचारात घेवून त्यासाठी खरेदी प्रक्रिया राबविणे आवश्यक आहे.

(२) उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. ०१.१२.२०१६ च्या शासन निर्णयासोबतच्या सुधारित नियमपुस्तिकेत विहित केलेल्या खरेदी कार्यपद्धतीचा अवलंब करून खरेदी करावयाच्या बाबी संबंधित सर्व निर्णय राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समिती घेण्यासाठी सक्षम राहील.

(३) स्पर्धात्मक निविदा झाल्यानंतर वाटाघाटी करण्याची आवश्यकता भासल्यास, उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.१.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या सुधारित नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.४.४.४.१ मध्ये नमूद तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

(४) राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीस आवश्यक ते सर्व सहकार्य करण्यासाठी तसेच खरेदी प्रक्रियेची कार्यवाही करण्यासाठी पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे कार्यालयाच्या स्तरावर स्वतंत्र खरेदी कक्षाची स्थापना करण्यात येवून केवळ या कक्षामार्फतच विविध बाबींच्या खरेदीसाठी आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी.

(५) ई-निविदेद्वारे प्राप्त होणाऱ्या विविध बाबींच्या न्यूनतम दरांना शासनाची अंतिम मान्यता घेण्यात यावी.

(६) सदर शासन निर्णयातील तरतुदी दि. ०१.०४.२०२२ पासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने आवश्यक त्या सविस्तर मार्गदर्शक सूचना आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी तात्काळ क्षेत्रिय कार्यालयांना निर्गमित कराव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४०५१६१६०१०७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,**

DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=690002a7555559bb015f315b03adb3305c59fe381e4dcda1439d119129672733, pseudonym=B6831977DAFE9C462B1F5207DB8DC23334F34E62, serialNumber=5DBCE7AE3AC30F0E55C90CD14E851251037DC61F3291C80EA8638C44D41143AA, cn=DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
Date: 2022.04.05 16:16:21 +05'30'

**(डॉ. संजय वि. डोईजोडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
४. मा.मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, जुने वळू संगोपन केंद्र, बडा हनूमान मंदिराजवळ, सिव्हिल लाईन्स, तेलंगखेडी, नागपूर.

७. व्यवस्थापकीय संचालक, अहिल्यादेवी होळकर महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे.
८. सहआयुक्त पशुसंवर्धन, भारतरत्न अटलबिहारी वाजपेयी राज्यस्तरीय रोग अन्वेषण विभाग, पुणे.
९. सहआयुक्त पशुसंवर्धन, पशु जैव पदार्थ निर्मीती प्रयोगशाळा, पुणे.
१०. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन
११. संशोधन संचालक, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.
१२. पशुसंवर्धन उपायुक्त, गुण नियंत्रण प्रयोगशाळा, गोरंगाव,मुंबई
१३. विभागिय व्यवस्थापक, गोठित रेत प्रयोगशाळा, पुणे, नागपूर व औरंगाबाद.
१४. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त.
१५. सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, खाद्य विश्लेषण प्रयोगशाळा, गोखलेनगर, पुणे.
१६. सर्व सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळा
१७. महालेखापाल कार्यालय १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण), मुंबई / नागपूर.
१८. अवर सचिव (पदुम-३), कक्ष अधिकारी (पदुम-१, २ व १६), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती पदुम-४.